**झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, बृहन्मुंबई-ठाणे कार्यालयातील वरिष्ठ पदावरील अधिकाऱ्यांची प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यासाठी कार्यपध्दती विहित करणेबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्र. प्रतिनि-१४०७/प्र.क्र.१२३/१४/झोपसु-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय,
मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०९ जानेवारी, २०१७

**संदर्भ** :- १) शासन निर्णय, समक्रमांक दि.०३.०९.२०१४
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/कार्यासन-१२, दि. १७.१२.२०१६

**प्रस्तावना,**

झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, बृहन्मुंबई कार्यालयातील वरिष्ठ पदावरील रिक्त पदे भरण्यासाठी संदर्भीय शासन निर्णयान्वये -छाननी समितीचे◦ गठण करण्यात येवून प्रतिनियुक्तीसाठी शिफारस करण्यासाठी निकष ठरविण्यात आले होते. दरम्यान सामान्य प्रशासन विभागाचा शासन निर्णय, क्र. एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/कार्यासन-१२, दि. १७.१२.२०१६ अन्वये शासकीय अधिकारी/कर्मचारी यांच्या प्रतिनियुक्तीने नियुक्तीसाठी अटी व शर्ती व नियुक्तीची कार्यपध्दती याबाबतचे धोरण निर्गमित केले आहे. झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण बृहन्मुंबई-ठाणे कार्यालयात शासनाच्या वेगवेगळ्या विभागातून (जसे, महसूल विभाग, सहकार विभाग, नगर विकास विभाग इ. विभागाच्या आस्थापनेमधून) शासकीय अधिकाऱ्यांची पदे प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येते. या विभागातील अधिकाऱ्यांच्या प्रतिनियुक्तीसाठी आता उक्त सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णयातील तरतुदी लागू ठरतात. त्याचबरोबर म्हाडा व बृहन्मुंबई महानगरपालिका, ठाणे महानगरपालिका यांच्या आस्थापनेवरील अधिकाऱ्यांची विशेषत: अभियांत्रिकी संवर्गातील अधिकाऱ्यांची प्रतिनियुक्तीने नियुक्ती केली जाते. म्हाडा, बृहन्मुंबई महानगरपालिका व ठाणे महानगरपालिकाच्या आस्थापनेवरील अधिकाऱ्यांना उक्त सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१७.१२.२०१६ च्या तरतुदी लागू होत नाहीत. त्यामुळे झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, बृहन्मुंबई-ठाणे कार्यालयात शासकीय आस्थापनेवरील व म्हाडा, बृहन्मुंबई महानगरपालिका यासारख्या कार्यालयातील अधिकाऱ्यांच्या नियुक्ती करण्यासाठी स्वतंत्र कार्यपध्दती विहित करण्याचा प्रस्ताव विचाराधीन होता. त्यास अनुसरुन संदर्भीय दि.०३.०९.२०१४ रोजीच्या शासन निर्णयाचा हेतू कायम ठेवून त्यामध्ये विहित केलेल्या कार्यपध्दतीमध्ये सुधारणा करण्याची आवश्यकता निर्माण झालेली आहे. सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार शासकीय आस्थापनेवरील अधिकाऱ्यांच्या प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यासाठी स्वतंत्र शासन निर्णय निर्गमित करुन कार्यपध्दती विहित करण्यात

येईल. म्हाडा व बृहन्मुंबई महानगरपालिका व ठाणे महानगरपालिकाच्या आस्थापनेवरील अधिकाऱ्यांच्या नियुक्त्या करण्यासाठी खालीलप्रमाणे कार्यपध्दती विविध संवर्गातील विहित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणातील उपमुख्य अभियंता, सहाय्यक अभियंता व दुय्यम अभियंता या संवर्गातील रिक्त तसेच ज्यांचा प्राधिकरणातील प्रतिनियुक्तीचा कालावधी पुर्ण झाला आहे अशा अभियंत्यांना मुळच्या विभागात प्रत्यावर्तित करुन या संवर्गातील पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येईल. त्यासाठी गृहनिर्माण विभागाकडून कळविण्यात येणाऱ्या रिक्त पदांच्या संख्येएवढे अभियंत्यांची नावे म्हाडा, बृहन्मुंबई व ठाणे महानगरपालिका यांनी खालील निकष लावून गृहनिर्माण विभागाकडे पाठवावीत. गृहनिर्माण विभागामार्फत झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाचे अध्यक्ष/शासन यांची मान्यता घेऊन प्रतिनियुक्तीने नियुक्तीचे आदेश निर्गमित करण्यात येतील.

**निकष :-**

१) संबंधित अभियंत्याच्या अलीकडच्या पाच वर्षातील गोपनीय अहवाल विचारात घ्यावेत आणि या पाच वर्षाच्या गोपनीय अहवालाची सरासरी किमान -अ॰ दर्जाची असावी.

२) गृहनिर्माण, नगर विकास व अनुषंगिक क्षेत्रातील पदाशी निगडीत कामकाजाचा अनुभव असावा.

३) संबंधित अभियंत्याविरुध्द शिस्तभंग विषयक कारवाई अथवा फौजदारी स्वरुपाचे अन्वेषण प्रलंबित/प्रस्तावित नसावे. तसेच त्या अधिकाऱ्याविरुध्द नैतिक अध:पतन स्वरुपाचे दोषारोप सिध्द होऊन त्यासाठी शिक्षा अथवा दंड झालेला नसावा.

४) संबंधित अभियंत्यांचा शिल्लक सेवा कालावधी विचारात घेऊनच प्रतिनियुक्तीसाठी शिफारस करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०११०१५४२४६१७०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kishor Govind Pathade

Digitally signed by Kishor Govind Pathade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kishor Govind Pathade
Date: 2017.01.10 15:47:22 +05'30'

**(कि. गो. पठाडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव

२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई- ३२.

३. मा.मंत्री (गृहनिर्माण)/ मा.राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई.

४. प्रधान सचिव, गृहनिर्माण यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

५. मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण,प्रशासकीय इमारत, अनंत काणेकर मार्ग, वांद्रे (पूर्व) मुंबई-५१

६. उपाध्यक्ष, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व),मुंबई-५१

७. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, महापालिका कार्यालय, मुंबई- ४०० ००१.

८. आयुक्त, ठाणे महानगरपालिका, महानगरपालिका भवन, डॉ. अल्मेडा रोड, चंदनवाडी, पाचपाखाडी, ठाणे -४०० ६०२.

९. निवड नस्ती/ झोपसु-१